कन्याभूगाऽश्वदासीमरथग्रामतिलौकसाम् ।
दानं तनेऽस्य शीयान्त मुण्डशालायना द्विजैः ॥ ४ ॥

शीतलनाथ तीर्थंकरानंतर मलयदेशांत भद्रिलपुरींत मेघरथ राजा राज्य करीत होता त्याचा मंत्री सत्यकीर्ति सम्यक्त्वी होता राजानें एकदा कोणतें दान श्रेष्ठ म्हणून विचारलें असता जैनशास्त्रानुसार त्यानें सांगितलें कीं शास्त्रदान, अभयदान व अन्नदान असे उत्तम मध्यम व कनिष्ठ असे दानाचे तीन प्रकार आहेत राजाचे दरबारांत भूतिशर्मा ब्राह्मणाचा मिथ्यात्वी पुत्र मुण्डशालायन नामक होता तो म्हणाला कीं, कन्यादान, गजदान, सुवर्णदान, अश्वदान, दासीदान, गोदान, तिलदान, पृथ्वीदान, रथदान, व गृहदान अशीं दहाप्रकारचीं दानें आहेत कालप्रमानानुसार राजाला मिथ्यात्वमताची ही दहा प्रकारचीच दानें रुचली

॥ इति श्रीशीतलनाथस्य दशमम् ॥

---

मौर्ये द्वीपे सुकच्छास्य देशे क्षेमपुरे नृपः ।
नलिनप्रभ इत्यासीत्सोऽनन्तजिनतत्त्वपः ॥ १ ॥

पुष्करद्वीपांत मंदरापश्चिमभागाचे पूर्वविदेहक्षेत्रांतील सुकच्छदेशांत क्षेमपुर नांवाचें नगर होतें तेथें नलिनप्रभ नांवाचा राजा राज्य

१ शीतलस्य २ मलयदेशे भद्रिलपुरे मेघरथस्य राज्ञः मन्त्रिणा जैनेन सत्यकीर्तिनामिना शास्त्रादिदानेषु बहुलमर्थितेषु अपि कृतीतब्राह्मणपुत्रमुण्डशालायनस्य समाये कन्यादिदशदानानि मिथ्यात्वार्थं प्रदर्शं विस्तारयामास । तदैव सद्धर्मनाशस्तेन अधर्मतीर्थोत्पादकेन तथापरिचितः ॥ १ पुष्करद्वीपस्य पूर्वार्धे मान्दिरस्य ।

पुष्कळ पापाचरण केलें व शेवटी महातम प्रभा नांवाच्या सातव्या नरकांत गेला अश्वग्रीवाचा अंतिहि त्याच नरकांत गेला विजयानें विरक्त होऊन दीक्षा घेतली व मोक्षास गेला

**इति श्रीमेघचन्द्रतीर्थंकराश्वग्रीव प्रतिवासुदेव विजयबलदेव त्रिपृष्ठवासुदेवेतिवृत्तोत्तर मेकादशम् ॥११॥**

---

प्राग्द्वीपे वत्सकावत्यां यो रत्नपुरपालकः ।
पद्मोत्तराऽभूच्छ्रमणो युगन्धरजिनाभयात् ॥ १ ॥

पुष्करार्धद्वीपाच्या पूर्वेस मेरुपर्वताजवळ वत्सकावती देशांतील रत्नपुरात पद्मोत्तर नामक राजा राज्य करीत होता एकदा मनोहर पर्वतावर युगधर तीर्थंकर आले असता त्यांच्याजवळ राजानें दीक्षा घेतली

प्राप्तान्त्यनामा सोऽथ महाशुक्रस्य नेन्दन ।
वसुपूज्यस्य देवेऽभूत् चम्पायां सार्वसंयमम् ॥२॥

त्यानें सोळा भावनांचें चिंतन करून व तप आचरून तीर्थंकरनामकर्म बांधलें तेथून तो महाशुक्रनामक विमानांत इंद्र झाला नंतर चंपानगरचा राजा वसुपूज्य व राणी जयावती यांच्या पोटीं तो वासुपूज्यनामें करून जन्मला

---

१ पुष्करार्धपूर्वद्वीप मध्ये २ गमूष् ३ [illegible] ४ [illegible] प्राप्त निर्मो ।

कुमार एव संसारं तस्माद्ध्यानोद्युपेत्य च ।
निर्वेगी तीर्थकृत्यास्त भिय पायुपूर्व्यताम् ॥ २ ॥

कुमार असतानाच त्याना वैराग्य प्राप्त होऊन त्यांनी दीक्षा घेतली तपश्चर्या करून तीर्थ प्रवर्तित केले व मोक्षाला गेले

विन्ध्यशक्तिनृपो विन्ध्यपुरेऽभूदत्र भारते ।
सुषेणस्याथ कनकपुरेशो गुणमञ्जरीम् ॥ ४ ॥

या भरत क्षेत्रांत मध्यदेशातील विन्ध्यपुरात विन्ध्यशक्ति नामक राजा राज्य करीत होता त्याच वेळी कनकपुरात सुषेणराजा राज्य करीत होता त्याच्याजवळ गुणमंजरी नामक नर्तकी होती

नर्तकीरत्नमाकर्ण्य पराहूतेन याचितम् ।
अददानमवस्कन्द्य तं भित्त्वाजौ तदग्रहीत् ॥ ५ ॥

त्या नर्तकीरत्नाची कीर्ति ऐकून विन्ध्यशक्तीने तिला आपणाकडे पाठविण्यासाठी सुषेण राजाकडे दूत पाठविला त्याने तिला पाठविण्याचे नाकारल्यामुळे युद्ध करून विन्ध्यशक्तीने नर्तकी आणली

तन्मानभङ्गान्निर्विद्य सुषेणः सुव्रताज्जिनात् ।
महापुरेशिना वायुरथनाम्ना चरत्तपः ॥ ६ ॥

मानभंग झाल्यामुळे सुषेणराजा खिन्न झाला त्यावेळी सुव्रत जिनेश्वराजवळ महापुरच्या वायुरथराजासह दीक्षा घेऊन तपश्चर्या केली

१ प्राप्य २ पुरेऽभूत् ३ वासपूज्यसमाप वासुपू ज्या वा वासुपूज्य न्मनिर्मो ४ ग्राहीत्वा ५ सुषेण । ६ महापुरपतिपुरस्वामिना ।

विमानेऽनुत्तरे वायुरथोऽ भूत्सार्णवे मखे¹ ।
निर्दानिकाऽन्योऽनुपमे देवो द्वारावतीपतेः ॥ ७ ॥

वायुरथमुनि प्राणतस्वर्गांतील अनुत्तरविमानांत इन्द्र झाला तेथून तो अनुत्तरविमानेश द्वारावतीचा राजा ब्रह्म व राणी उषा यांच्या पोटीं द्विपृष्ठ नांवानें जन्मला

सुषेणनृपाऽचलास्याऽभूत्सूर्यो रामश्चरी हरिः ।
द्विपृष्ठाख्यो मघे भ्रान्त्वा भोगवर्धनभूपतिम् ॥ ८ ॥

सुषेणराजाचा जीव राजा ब्रह्म व राणी सुभद्रेच्या पोटीं अचल नांवानें जन्मला हे दोघ बळभद्र व नारायण होते विंध्यशक्तीनें भोगवर्धननगरचा राजा श्रीधर याचे पोटीं तारक नांवानें जन्म घेतला

तारकोऽर्ध्यं भाविहरीभूतं गन्धेभयाचिनम् ।
हत्वारिं सोऽर्धचिस्थानं धिनोंमायागाद्रक्षःश्रियम् ॥ ९ ॥

तारक प्रतिनारायण होता तारकानें द्विपृष्ठ व अचल यांच्याकडे असलेला प्रस्यात हत्ती मागितला तो त्यांनीं न पाठविल्यामुळें तारकानें त्यांच्याशीं युद्ध केलें पण तो त्यांत मारला जाऊन सातव्या नरकांत गेला द्विपृष्ठहि त्याच नरकास गेला अचलानें मात्र यामुळें विरक्त होऊन दीक्षा घेतली व तो मोक्षाला गेला

१ स्वर्गे २ ३ विन्ध्यशक्तिचरो इत निदानः कुरेन्द्र मागमत्स्वर्गे अनुपमे विमाने ४ ब्रह्मनृपसुत पुत्रः ५ पूर्वो वायुरथचर ६ चर सुषेणः ७ विन्ध्यशक्तिचर ८ द्विपृष्ठः ९ सप्तम नरक १ रिपुघातकः ।

इत्याशाधरहब्धे त्रिषष्टिस्मृतिनाम्नि महापुराणान्तस्तत्त्वसङ्ग्रहे श्रीवासुपूज्यतारक प्रतिकेशवाचलाख्यबलद्विपृष्ठाख्यकेशवेतिवृत्तोत्तरं पुराणं द्वादशम्‌ १२

---

मेतीम्य धातकीखण्डमेरूस्यापग्विदेहगे ।
विषये रम्यकावत्यां यो महानगरेऽधिराट्‌ ॥ १ ॥

धातकी खंडांत मेरु पर्वताच्या पश्चिमेस रम्यकावती देशांतील महानगरांत पद्मसेन नामक राजा राज्य करीत होता

पद्मसेनस्तपः सर्वगुप्तकेवलिसन्निधौ
गृहीत्वैकादशाङ्गाब्धीस्तीर्थकृन्नाम बद्धवान्‌ ॥ २ ॥

त्यानें प्रीतिंकरनगरांत सर्वगुप्तकेवली आले असतां त्यांच्या जवळ दीक्षा घेतली एकादशांगांचें अध्ययन करून तीर्थंकर नाम कर्म बांधिलें

सहस्रारेऽभवच्छक्रोऽभूच्च्युतः काम्पिल्यपत्तने ।
कृतवर्मनृपस्याभूत्सुतो हेमन्तसम्पदाम्‌ ॥ ३ ॥

तेथून तो सहस्रार नामक बाराव्या स्वर्गांत इंद्र झाला पुढें काम्पिल्य नगरीचा राजा कृतवर्मा व राणी जयश्यामा यांच्या पोटीं विमलनाथ नावानें जन्मला

हिमानीं वीक्ष्य निर्ग्रन्थी भूय ध्यानाप्तकेवलः ।
धर्मं भणीय सिद्धस्तं स्तुवे विमलवाहनम्‌ ॥ ४ ॥

१ पश्चिमः । २ जयश्यामामातृकः ।

एकदा हेमन्तऋतूतील सृष्टिशोभा क्षणार्धात नष्ट झालेली पाहून विमलनाथांना वैराग्य उत्पन्न झाले व त्यांनी निर्ग्रंथ बनून तपश्चर्या केली व धर्मतीर्थ चालू करून सिद्धपदाला ते गेले त्या विमलवाहन तीर्थंकराची मी स्तुति करतो

योऽभूदपरविदेहेऽभूच्छ्रीपुरे नन्दिमित्रराट् ।
स सुव्रतव्रतमुने: प्राप्य व्रतोन्त्यानुत्तरं गत: ॥ ५ ॥

याच भरतक्षेत्राच्या पश्चिमविदेहक्षेत्रातील श्रीपुरात मित्रनंदी नामक राजा होता एकदा तो सुव्रतनाथतीर्थंकराच्या दर्शनास गेला असतां त्याची बोधवाणी ऐकून विरक्त झाला व तप आचरून सर्वार्थसिद्धि नामक स्वर्गातील अनुत्तरविमानात अहमिंद्र झाला

भरतेऽस्मिन्कुणालाख्ये देशे श्रावस्त्यधीश्वर: ।
सुकेतुर्भोगसक्तोऽभूत्पिद्धोऽप्यसकृद्धितै: ॥ ६ ॥

या भरत क्षेत्रातील कुणाल देशांत श्रावस्ती नामक नगरीत सुकेतु नामक राजा राज्य करीत होता तो फार भोगासक्त होता. त्याचे मातापिता, मंत्री व प्रजाजन त्याचा फार निषेध करीत

द्यूतं दीव्यन्सर्वस्यास्य हारिताशेषवस्तुक: ।
सुदर्शनाचार्यपार्श्वस्थो तपसाप्तुना ॥ ७ ॥

द्यूतादिव्यसनात त्याचे सर्वस्व गमावले तेव्हा पश्चात्ताप पावून त्याने सुदर्शनाचार्यांच्या जवळ दीक्षा घेतली व तप आचरिले

१ मित्रनंदि २ पश्चिमविदेहक्षेत्रातील प्रभृति ३ भेदयन् दीक्षा प्रति व्यापितेन्यस्य न शक्या न पतिष्यति ।

त्या युद्धात स्वयंभूनें सोडलेल्या चक्रानें मधुराचा नाश झाला व तो सातव्या नरकांत पडला. स्वयंभूही त्याच नरकांत गेला. त्यामुळें व्यथित होऊन धर्मबलदेवानें दीक्षा घेऊन मोक्षपद गांठलें.

मधुरारामदत्तादिभवी मेरुश्चमन्दरः ।
वारुणीपूर्णचन्द्रादिभवी विमलसद्रूपी ॥ १२ ॥

याचकाळांत श्रीविमलतीर्थंकरांचे मेरु व मंदर नामक दोन गणधर होते. त्यांची माहिती अशी—कौशल देशांतील वृद्ध नामक गांवांत मृगायण नांवाचा एक ब्राह्मण होता. त्याच्या बायकोचें नांव मधुरा. हिचाच जीव पुढें मेरुगणधर झाला. या ब्राह्मण दांपत्याला वारुणी नामक मुलगी झाली. हिचा जीव पुढें मंदरगणधर झाला. मधुराब्राह्मणी मेल्यानंतर राजाची राणी झाली. ही सिंहसेन राजाची पत्नी. हिनेंच सुभूतिनामक मंत्रिमित्र शेठची ठेवलेली रत्नमंजूषा मोठ्या युक्तीनें शेटजीला मिळवून दिली. ही राणी मेल्यानंतर महाशुक्रस्वर्गांत देव झाली. तेथून ती धरणीतिलकनगरच्या राजा मतिवेग व राणी सुलक्षणा यांच्या पोटीं श्रीधरानामें कन्या जन्मली. श्रीधरा पुढें अर्जिका बनली व मेल्यानंतर आठव्या कापिष्ट स्वर्गांत देवी झाली. पुढें पृथ्वीतिलक नगरीचा राजा मतिवेग व राणी प्रियकारिणी यांच्या पोटीं ही रत्नमाला नामें कन्या जन्मली. नंतर तो जीव स्वर्गांत अच्युत देव झाला. तेथून

१ मेरुमन्दरौ । २ रामदत्तादिभवी यस्य मेरोः सः । ३ पुनः श्रीविमलनाथकालचे बाही ।

तो जीव अयोध्यानगरीचा राजा अर्हद्दास व राणी सुव्रता यांच्या पोटीं श्रीवर्मा नांवें करून जन्मला. हा श्रावकव्रत पाळून मेल्यानंतर सौधर्म स्वर्गांत आदित्याभ नामक देव झाला. हाच देव उत्तरमथुरानगरीचा राजा अनन्तवीर्य व राणी मेरुमालिनी यांचे पोटीं मेरु नांवानें जन्मला व विमलनाथ तीर्थंकराचा गणधर झाला. मधुरा आर्यिकेची मुलगी वारुणी मेल्यानंतर तिच्या रामदत्ताभवांत तिचा पूर्णचन्द्र नामक मुलगा होऊन जन्मली. पूर्णचंद्र दीक्षा घेऊन मेल्यानंतर वैडूर्यदेव झाला. नंतर मधुरेच्या श्रीधराभवांत तो देव यशोधरा नांवें करून जन्मला. तिचे सूर्यावर्तांशीं लग्न झालें व त्यांना रश्मिवेग नामक मुलगा झाला. यशोधरा आर्यिका होऊन मेल्यानंतर आठव्या कापिष्ठ स्वर्गांत देवी झाली. मधुरेच्या रत्नमालाभवांत ही देवी रत्नायुधनामक पुत्र होऊन तिला जन्मली. अयोध्येचा राजा अर्हद्दास व राणी जिनदत्ता यांच्या पोटीं पुढें रत्नायुध मेल्यानंतर विभीषण नांवानें जन्मला. हा नारायण मेल्यावर दुसऱ्या नरकास गेला. तेथून तो अयोध्येचा राजा श्रीवर्मा व राणी सुसीमा यांचे पोटीं श्रीधाम नांवानें जन्मला. दीक्षा घेऊन तो मेल्यानंतर पांचव्या ब्रह्म नामक स्वर्गांत देव झाला. श्रीत्रिलोकपुरचा राजा वज्रायुध व राणी सर्वश्री यांच्या पोटीं तो देव जयंत नांवानें जन्मला. पुढें तो धरणेंद्र झाला. नंतर हा धरणेंद्र उत्तरमथुरानगरीचा राजा अनन्तवीर्य व राणी अमितमती यांच्या पोटीं मन्दर नांवें करून जन्मला व विमलनाथ तीर्थंकराचा गणधर बनला. याप्रमाणें हे दोन गणधर

श्रोऽग्निस्याममुरणोक्त्वा सत्यघोषादिभूपकम्।
श्रीरितो मन्दरास्थ्योऽमृतणी मेरुर्थ स क्रमात् ॥१६॥

रामन्तेने रत्नमूषा मदमित्र दाटका परत दिली व श्रीभूति उर्फ सत्यघोष मन्याची श्रमारी बाहेर वाणल्यानंतर सिंहसेन राजानें त्याला शिक्षा दिली होती त्यामुळें तो त्याचा वैरी बनला होता मेल्यानंतर तो मंत्री अगंधन नामक सर्प झाला मेल्यानंतर तो तिसऱ्या नरकांत गेला तेथून चमरहरिण झाला पुढें कुक्कुट-सर्पयोनीत गेला नंतर पुन्हा तिसऱ्या नरकांत जाऊन अजगरयोनीत जन्मला नंतर तो भिल्ल झाला तेथून तो भरतक्षेत्रांतील भूतरमन नामक वनांत गोशृंग तापसी व त्याची भार्या शंखिका यांच्या पोटीं मृगशृंग नांवानें जन्मला त्यानें पंचाग्नि साधन केलें व विद्याधरवैभव पाहून तें निदान केलें त्यामुळें तो वज्रदंष्ट्र व विद्युत्प्रभा या विद्याधर जोडप्यापासून विद्युद्दंष्ट्र नांवेंकरून जन्मला राजा सिंहसेन मेल्यानंतर अशनिघोषनामक हत्ती झाला तो मरून नंतर श्रीधरदेव, रश्मिवेग अर्कप्रभ वगैरे जन्म घेऊन चक्रपुरचा राजा चक्रायुध व राणी चित्रमाला यांच्या पोटीं वज्रायुधनांवें करून जन्मला अशनिघोष हत्तीला विद्युद्दंष्ट्रानें सर्पभावांत दंश करून मारलें होतें राजा वज्रायुध मुनि होऊन प्रतिमा योग धारण करून तपश्चर्या करीत असतां विद्युद्दंष्ट्रानें मिळ-

१ सत्यघोष २ सिंहसेन ३ आदित्याभसुर मेरुसूर् चक्रायुध न के मरकत्पुर।

भवांत त्याला ठार मारलें होतें तेव्हां तो जीव सर्वार्थसिद्धिस्वर्गांत अहमिंद्र झाला व नंतर संजयंत झाला अशा रीतीनें संजयंतमुनि व विद्युद्दंष्ट्राचें भवोभवींचें वैर असल्यामुळें विद्युद्दंष्ट्रानें मुनिला विनाकारण सतावलें असें धरणेंद्राला आदित्याभदेवानें सत्यघोष व सिंहसेन भवापासून हकीकत सांगून समजाविल्यावर तो स्वस्थ झाला

**इति श्रीविमलनाथधर्मस्वयंभूमधुसूदनमेरुसञ्जयन्तमेरुमन्दरचरितोत्तरं त्रयोदशम् ॥ १३ ॥**

राजा प्राग्धातकीखण्डकच्छकावत्यवस्थितः ।
पुरे पद्मरथोऽरिष्टे यः भित्वार्हत्स्वयंप्रभात् ॥ १ ॥

धातकीखंड द्वीपांत मेरुपर्वताजवळ कच्छकावती देशांत अरिष्ट नामक गांवचा राजा पद्मरथ स्वयंप्रभ तीर्थंकराजवळ दीक्षा घेऊन त्याचाच आश्रय करता झाला

सोऽपि बध्वा तीर्थकृत्त्वं भुक्त्वाच्युतस्वर्गमच्युत ।
साकेते सिंहसेनस्य पुत्रीभूय विरज्य च ॥ २ ॥

बरीच तपश्चर्या करून त्यानें तीर्थंकरनामकर्म बांधलें व सोळाव्या अच्युतस्वर्गांत पुष्पोत्तर विमानांत देव झाला तेथून तो अयोध्येचा राजा सिंहसेन व राणी जयश्यामा यांच्या पोटीं अनंतनाथ नांवें करून जन्मला बरीच वर्षें राज्य करून त्यानें दीक्षा घेतली

१ भित्वा आश्रित्य । २ षोडशस्वर्गीय अच्युतें । ३ जयश्यामायाः ।

उल्कापातेक्षणाज्जात वैराग्यस्तीर्थकृत्सताम् ॥
भव्याऽनन्तस्मदम्भाप्यात्मनः पायादनन्तजित् ॥३॥

एकदा उल्कापात पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झालें व दीक्षा घेऊन त्यानें तपश्चर्या केली व सर्वज्ञ बनून सज्जनांत श्रेष्ठ असा धर्मतीर्थ प्रवर्तित करून जे मोक्षाला गेले ते अनतनाथ तीर्थंकर आमचें रक्षण करोत

वसुषेण पौदनेऽस्मिन्नृपो नन्दास्यं मह्यमा ॥
तां वीक्ष्य मलयाधीशस्तान्निन्ये चण्डशासन ॥ ४ ॥

याच भरत क्षेत्रातील पौदनपुरांत राजा वसुषेण व राणी नंदा राज्य करीत होती मलयदेशाचा राजा चंडशासन हा वसुषेण राजाचा मित्र होता नंदाराणीला पाहून तो मोहित झाला

कामार्तो हृतवत्सर्वां शोकार्तः सन्नपोषितः ॥
श्रेयोगणं तुर्यं कृत्वा सिंहनिःक्रीडितं तप ॥ ५ ॥

कामपीडित झालेल्या चंडशासनानें तिला पळवून नेली तेव्हा राजा वसुषेण फार कष्टी झाला पण त्याचा निरुपाय होता म्हणून त्यानें वागे होऊन श्रेय नामक गणधरापासून दीक्षा घेतली व सिंहनिःक्रीडित नामक घोर तप त्यानें आचरिलें

१ वसुधपाला मध्ये मार्गणेऽक्ष । २ वसुसेनस्य मार्याभवत् ३ मदा ४ तस्य वसुसेनस्य ५ उपायेन ता हृत्वा स्वपुर गतः ६ वसुसेना ७ प्रबोध। भूत्वा श्रेय स्य प्रवीप्रचितः ८ गुरुणा ।

झाले पुढे तो रत्नपुरचा राजा भानु व राणी सुप्रभा यांच्या पोटीं जन्मला

वीक्ष्योल्कां यानमारूढः संयमारूढमेमस ।
मेरुवर्धमतीर्थोऽसौ धर्मो धर्मं तनोतु नः ॥ ३ ॥

एकदा उल्कापात पाहून धर्मनाथाना वैराग्य उत्पन्न झाले व त्यांनी दीक्षा घेऊन तप आचरिलें धर्मतीर्थ प्रस्थ करून जे मोक्षाला गेले ते धर्मनाथतीर्थंकर आमचें रक्षण करोत

मरौ-मेत्यगिह द्वीपे वीतशोकापुरीपतिः ।
नरादिवृषयस्त्यक्त्वा तपो दमवरान्तिके ॥ ४ ॥

मेरु पर्वताच्या पश्चिमेस धात धातकी खंडांतील राजगृह नगरीत नरवृषभ नावाचा राजा होता त्याने दमवर मुनीजवळ दीक्षा घेऊन तप आचरिलें मरणानंतर तो सहस्रारनामक स्वर्गांत देव झाला

सहस्रार समापास्मिंस्तथा राजगृहे नृप ।
सुमित्रो मल्लवारसा राजसिंहेन भूभुजा ॥ ५ ॥

त्याच राजगृहीचा राजा सुमित्र नावाचा मल्ल होता व त्यामुळें त्याला गर्व झाला होता राजसिंह नामक दुसरा एक मल्लराजा राजगृहीस एकदा आला

निर्मितो दौर्मुषा कृष्णासायान्त दुर्धरं तप ।
कृत्वा मृतो निदानेन माहेन्द्रोऽभून्महर्द्धिकः ॥ ६ ॥

१ प्रवर्त्य धर्मतीर्थं धर्मतीर्थमस्य वा २ पश्चिमे ३ मल्लयुद्धम ४ निदानिर्बन्धितादिक ।

यप्रमाणे त्याने सुमित्राचा पिच्छाव केला तेव्हां तो फार दुःखी झाला व कृष्णाचार्याजवळ जाऊन त्याने दीक्षा घेतली. सिंहनिष्क्रीडितादि घोर तपें आचरून त्यानें निदान बांधलें की आपण भविष्य राजाचे मारणार तर तो बाप्या माहेंद्र नामक स्वर्गांत महर्द्धिक देव झाला.

भोगोऽथ सिंहसेनस्य सूनुः खगपुरेशिनः ।
सीरी सुदर्शनोऽन्योऽभूद्विष्णुः पुरुषसिंहकः ॥ ७ ॥

खगपुरचा राजा सिंहसेन व राणी विजया यांच्या पोटीं नरवृषभाचा जीव स्वर्गाहून सुदर्शन नावानें जन्मला त्याच राजाच्या अम्बिकाराणीपासून सुमित्राचा जीव स्वर्गाहून येऊन विष्णु नांवानें झाला

राजसिंहचरो भ्रान्त्वा चैत्री हास्तिनपुरपतिः ।
मधुक्रीडाभिधो भर्त्रे याच्यमानस्ततः करम् ॥ ८ ॥

राजसिंहराजाचा जीव अनेक योनींत जन्मत हस्तिनपुरचा राजा मधुक्रीड नांवें करून झाला व त्यानें सुदर्शन व विष्णु-पुरुषसिंह राजाकडे करभार मागितला

केशवेन हतोऽमर्षात्पापिस्थानमभ्यगात् ।
धर्मतीर्थकराद्धर्म्यं सोऽपि सिद्धिमगाद्बलः ॥ ९ ॥

तेव्हां त्या केशवानी करभार नाकारल्यानंतर तो युद्धास आला व विष्णूकडून मारला गेला विष्णूहि नंतर मेला व सातव्या नरकास गेला त्यामुळें सुदर्शनाला वैराग्य वाटून त्यानें

१ नरवृषभचरः २ सुमित्रचरः ३ सुदर्शनः ४ ...मांसं... ...सह कृत्वा ५ पुरुषसिंहः ६ पुरुषसिंहेन सह ।

धर्मनाथतीर्थकरांजवळ दीक्षा घेतली व तपश्चर्येने केवलज्ञान प्राप्त करून घेऊन तो मोक्षाला गेला

विचित्रपुरेराण्मध्यग्रैवेयकमगात्तपः ।
तप्त्वा नरपतिर्वासुपूज्यान्ते कोसलापतिः ॥ १० ॥
मघवा च सुमित्रस्य पुत्रो भूत्वा स चक्रिताम् ॥
भुक्त्वाथाभयघोषास्यकेवल्यन्ते परं पदम् ॥ ११ ॥

विचित्रपुरचा राजा नरपति नामक होता त्याने तप आचरून मध्यम ग्रैवेयक नामक स्वर्गात अहमिंद्रपद मिळविले तेथून तो अयोध्येचा राजा सुमित्र व राणी भद्रा यांच्या पोटीं मघवान नावानें जन्मला तो चक्रवर्ती होता वरेच वैभव भोगल्यानंतर त्याला उपरति झाली व त्याने अभयघोष जिनेंद्राची वाणी ऐकून दीक्षा घेतली वरीच तपश्चर्या करून तो मोक्षाला गेला

अथाच्युतादेत्य सूर्यवंशजाऽनन्तवीर्यमः ॥
चक्री सनत्कुमारोऽभूत्साकेतेऽत्यन्तरूपवान् ॥ १२ ॥

अयोध्येचा सूर्यवंशी राजा अनन्तवीर्य व राणी सहदेवी यांच्या पोटीं अच्युतनामक सोळाव्या स्वर्गातील देवाने सनत्कुमार नावानें जन्म घेतला हा मुलगा रूपवान असून चक्रवर्ती होता

सौधर्मेन्द्रस्तुतं श्रुत्वा तद्रूप वीक्ष्य ससति ।
द्वौ देवावूचतुस्तं मो चक्रिन् ! शृणु यथाश्रुतम् ॥ १३ ॥

१ विचित्राख्यनगरस्य नाम्नो नरपतिनामा । २ सुमित्रस्य । ३ तस्य रूप ।

सौधर्मेन्द्राच्या समोर सनत्कुमाराच्या रूपाची स्तुति केली ऐकून दोन देव ते प्रत्यक्ष पाहण्यास आले व रूप पाहून म्हणाले

रूपं तथैव ते हेतुर्न्यूनमपक्षणान्मनाक् ।
श्रुत्वेति चक्री निर्विद्य दीक्षितो विहर्तुमरन् ॥१४॥

हे चक्रवर्ति, तुझें रूप असामान्य आहे खरें पण आज आम्ही प्रथम पाहिल्या पेक्षा आतां तें थोडेसें कमी झालें आहे. तें ऐकून त्याला वैराग्य उत्पन्न झालें व दीक्षा घेऊन त्यानें तपश्चर्या केली

१ मात्सर्यैः असहन्व्याधीन्सौधर्मेण पुनः स्तुतः ।
वैद्यीभूयामरैः कश्चित्परीक्षितुमागतः ॥ १५ ॥

तपश्चर्येत तो दुःख न मानता अनेक व्याधि सहन करूं लागला म्हणून सौधर्मेन्द्रानें त्याची पुन्हा स्तुति केली तें ऐकून एक देव वैद्याचा वेष घेऊन त्याची परीक्षा करण्यासाठीं आला

भो मुने ! हन्मि ते व्याधीनित्युक्तस्तेन सोऽब्रवत् ॥
शरीरस्पर्शमात्रेण पश्य शाम्यन्ति मे गदाः ॥ १६ ॥

हे मुने मी तुझी व्याधि नाहींशी करतो असें देवानें म्हटलें तेव्हा शरीराला स्वतः स्पर्श करून मुनीनीं आपले सर्व रोग नाहींसे केले

१ कारण किंचित कमी २ ईर्ष्या ३ निर्विण्ण ४ चोरांनी किंवा सहमान ५ वैद्यवेष धरणा ६ हस्तस्पर्शेन रूपमर्पितं प्रत्यक्षं प्रकट उत्पादित ।

जम्बुद्वीपांत पूर्वविदेहक्षेत्रांत वत्सकावती देशांतील प्रभाकरी नगरीत राजा स्तिमितसागर व राणी वसुंधरा यांच्या पोटीं रविचूडदेव अपराजित नामें करून जन्मला व त्याच राजाच्या अनुमती राणीला मणिचूडदेव अनंतवीर्य नांवानें जन्मला

सिद्धविद्यौ नर्तकीप्सु दमितारिमदघ्नकिणम् ।
हत्वा तत्र हरिर्भूत्वा मही धर्मोऽग्रजोऽजनि ॥११॥

हे दोघे भाऊ परस्परावर प्रेम करीत राज्य करीत बर्बरी व चिलातिका या दोन नर्तिकांचें नृत्य त्यांना फार आवडे शिवमंदिर नगराचा राजा दमितारि याला त्या नर्तकींचा मोह पडला त्यानें त्या मागारिन्या पण बरेच दोघा भावांनी त्याला पाठविलें नाहीं व स्वत च विद्यादेवींच्या साहाय्यानें त्या नर्तकींचा वेष घेऊन गेले व राजाला संतुष्ट केलें या वेषधारी दोन नर्तकी जवळ राजकन्या कनकश्रीला नटन शिकण्यास ठेवलें तेव्हां हे दोघे भाऊ तिला पळवून घेऊन गेले दमितारीला सर्व प्रकार कळल्यावर तो प्रभाकरी नगरीवर चाल करून गेला अपराजित व दमितारीची लढाई सुरू असतां अनंतवीर्यानें त्याला ठार मारलें अनंतवीर्यनारायण मरून रत्नप्रभा नामक पहिल्या नरकांत गेला

रामोऽप्युत्तन्द्रस्तपसा ततोऽभीन्द्रभुवा हतौ ।
स्वर्गद्भूतं तपः मार्ष्य तं निन्द्य से प्रतीन्द्रताम् ॥१२॥

१ बर्बरी चर्चरीका नृत्यः २ अजनि ३ उत्साहेन सम्यक्त्वेन ४ अनंत वीर्यचर ५ अच्युतेन्द्र ।

११ त्यामुळें अपराजित बळदेवास फार दुःख झालें त्याने यशो-
धर मुनीजवळ दीक्षा घेतली अवधिज्ञान उत्पन्न झाल्यावर एक
महिनाभर अनशनव्रत आचरून तो अच्युतस्वर्गात इंद्र झाला
स्तिमितसागर मेल्यावर धरणेंद्र झाला होता त्यानें अनंतवीर्याच्या
जीवास बोध केल्यावर पहिल्या नरकांतून निघून तो मेघनाद विद्या-
धर झाला पुढें मुनि बनून मेल्यानंतर अच्युतस्वर्गात प्रतींद्र
झाला

च्युत्वेन्द्रो मङ्गलावत्यां चक्री वज्रायुधोऽभवत् ।
युवराजोऽन्यश्च सहस्रायुध क्षेमङ्करीपतः ॥ १३ ॥

अपराजिताचा जीव स्वर्गातून पूर्व द्वीपांत मंगलावती देशां-
तील रत्नसंचयपुरचा राजा क्षेमंकर व राणी कनकचित्रा यांच्या
पोटी वज्रायुध नावानें जन्मला अनंतवीर्याचा जीवहि स्वर्गातून
येऊन त्याच राजाला लक्ष्मीमती राणी पासून सहस्रायुधनामें
जन्मास आला

शुद्धदृक्सावधिश्चक्री तपसापादहमिन्द्रताम् ।
सानुज पुष्कलावत्यामथासौ पुण्डरीकिणीद् ॥ १४ ॥

सम्यग्दर्शन प्राप्त करून घेऊन वज्रायुधानें क्षेमंकर अर्हता-

१ प्रतीन्द्रः २ ईशानेन्द्रसुर दर्शनविशुद्धिसम्यक्त्ववर्णनाश्रवणेन कृत
वादेन विचित्रचूलदेवेन पूजितस्तथा विद्युद्दंष्ट्रचरदेवेन कृतोपसर्गे मुक्त्वा
आत्मचक्रतोऽस्य अनुरागमयविमुक्तः । ३ उपरिमग्रैवेयकाद्यविमाने सौमन-
साख्ये ।

दत्वीग्न्याग्रमयीक्षासपुण्यादिविस्तपःश्रितः ।
पितुस्तीर्थकृतो बद्धतीर्थकृत्त्वःसहानुम ॥ १६ ॥

मुनींना आहारदान उपवास तीर्थंकरपूजन वगैरे करूनें आचरून मेघरथानें धनरथाजवळ दीक्षा घेतली एकादशांगाचें अध्ययन करून त्यानें तीर्थंकरनामकर्म बांधलें दृढरथानेंहि दीक्षा घेतली

सर्वार्थसिद्धौ मासः षं भुक्त्वास्मिन् विश्वसेननृपात् ।
कामः शान्तिरभूच्चक्री तीर्थकृत्कामजातुमः ॥ १७ ॥

कुरुजांगलदेशांतील हस्तिनापुरात राजा अजितसेन व राणी प्रियदर्शना यांच्या पोटीं जन्मलेला विश्वसेन नामें करून राजा राज्य करीत होता गंधारदेशांत गंधार नगरचा राजा अजितंजय व राणी अजिता यांची मुलगी ऐरा विश्वसेनास देण्यांत आली त्यांच्या पोटीं मेघरथ स्वर्गांतून येऊन शांतिनाथ तीर्थंकर जन्मले दृढरथ चक्रायुध होऊन जन्मला

चक्रायुधो गणधरः प्राप्तवांश्च स्वं विभूषयन् ।
इत्यूचावर्णे निजस्थापाद्द्वयमुक्तयोगाधिकः ॥ १८ ॥

अमितदिवाराणी, निमळप्रभअन्य, श्रीविजय देव, अमततीर्थ नारायण, नारकी, मेघनाद, प्रतीन्द्र, सहस्रायुध अहमिंद्र दृढरथ, अहमिंद्र इतक्या भवांतून आलेल्या तो दृढरथाचा जीव चक्रायुध

१ पुण्यवंत आणि धर्मविर्मला २ पुत्र पेरागमें ३ पूर्वमनुष्य इत्यानीमपि अनुस्वयतमनुषः ४ मांधनि भूतमनुपचार ।

नगरींत राजा सिंहरथ राज्य करीत होता एके दिवसा आकाशांत उल्कापात पाहून त्याला वैराग्य प्राप्त झालें व वृषभमुनींच्या जवळ दीक्षा घेऊन यानें तप आचरिलें षोडश भावनांचें चिंतन करून त्यानें तीर्थंकरनामकर्म बांधलें

भद्रतीर्थकरस्तोऽभादन्त्यौ त्रिदशसत्सुरैः ।
या भूत्वा सूरसेनस्य कुरुरामस्य हस्तिने ॥२॥

शेवटीं समाधिमरण साधून तो सर्वार्थसिद्धि विमानांत अहमिंद्र झाला तेथून कुरुजांगल देशांतील हस्तिनापुरचा राजा सूरसेन व राणी श्रीकांता यांच्या पोटीं तो कुंथुनाथ नामें करून जन्मला

प्राप्य षट्खण्डभिर्यं भातु रन्त्यागच्छन्वनान्मुनिम् ।
दृष्ट्वा तप स्वं पृष्टस्तेन्द्रियकिल्बे एप मास्यत ॥ ३ ॥

त्याला चक्रवर्तित्व प्राप्त झालें एकदा तो मंत्र्यासह वनक्रीडा करून येत असतां त्यानें एक तपस्वी पाहिला असें तप केलें असतां चक्रवर्तीचें वैभव प्राप्त होतें व मोक्षहि मिळतो असें कुंथुनाथानें सांगितलें

इत्यथ मन्त्रिणा पृष्टः दृष्टपूर्वभवस्तपः ।
कृत्वार्हन्त्य गतमक्ष वार्धे कुन्थुं नमामि तम् ॥ ४ ॥

मंत्र्यानें विचारलेल्या प्रश्नास वरील उत्तर देऊन कुंथुनाथाला पूर्वभवांतील केलेल्या तपश्चर्येचें स्मरण झालें नंतर दीक्षा घेऊन त्यांनी

१ सर्वार्थसिद्धेः २ श्रीकान्तागर्भे ३ कौरवजाङ्गलदेशस्य ४ वैभवप्राप्ति-
दर्शिन्मने न मोक्षने वांदें दृष्टपश्चिमे मुक्ता मोक्ष यास्यति ।

सर्व आवरण केवलज्ञान मिळविलें व धर्मतीर्थ सुरू करून मोक्षास गेले त्या कुंथुनाथांना मी नमस्कार करतो

**इति श्रीकुन्थुनाथस्य सप्तदशम् ॥ १७ ॥**

---

कच्छाख्ये क्षेमपुरे तद्धीशोऽभूद्धनपतिर्नृपः ।
नन्दतीर्थकरात्प्राप्तसंयमोऽर्जिततीर्थकृत् ॥ १ ॥

कच्छ देशांतील क्षेमपुरांत धनपतिनामक राजा राज्य करीत होता त्यानें नंदतीर्थंकराची बोधवाणी ऐकून दीक्षा घेतली व तपश्चरण करून तीर्थंकर नामकर्म बांधलें

गत्वा जयन्तमागत्य हस्तिनेशात्सुदर्शनात् ।
मार्तजन्माप्तचक्रश्रीः शरदभ्रक्षयेक्षणात् ॥ २ ॥

तेथून तो जयंत नामक विमानांत अहमिंद्र झाला व पुढें हस्तिनापुरचा राजा सुदर्शन व राणी मित्रसेना यांच्या पोटीं जन्मला अरनाथाला चक्रवर्तीपद प्राप्त झालें बरीच वर्षे ऐश्वर्य भोगल्यानंतर त्यांना शरद्‌ऋतूंतील ढग एकदम विरल्याला गेलेले पाहून वैराग्य उत्पन्न झालें

आदाय संयमं लब्ध्वा केवलं धर्मदेशनात् ।
विश्वमुद्धृत्य यः सिद्धः स्मरामि तमरं प्रभुम् ॥ ३ ॥

दीक्षा घेतल्यानंतर त्यांना केवलज्ञान प्राप्त झालें धर्मतीर्थ प्रव-

१ कच्छाख्यविषये २ अर्जित पाठ अर्जिततीर्थकृत् ३ मित्रसेनायां
४ चक्रवर्ती सन् प्राप्तजन्मा ।

तप करून त्यांनी मन्मथीचा उद्धार केला व मोक्षपद मिळविलें त्या अरनाथांचें मी स्मरण करतों

भूपालाख्यो नृपोऽभासीज्जितो युद्धेऽरिभिस्तपः ।
सम्भूतान्ते स कृत्वागान्महाशुक्रं निदानवान् ॥४॥

याच भरतक्षेत्रांत भूपाल नामक राजा होता एका युद्धांत त्याचा पराजय झाल्यामुळें खिन्न होऊन त्यानें संभूतमुनीजवळ दीक्षा घेतली व खूप तपश्चर्या करून त्यानें निदान केलें की आपणाला चक्रवर्तिपद प्राप्त व्हावें समाधिमरण झाल्यानंतर तो महाशुक्र नामक देवाच्या स्वर्गांत देव झाला

सहस्रबाहुरिक्ष्वाकुः साकेतेऽजनि तत्प्रिया ।
जाता चित्रमति कन्याकुब्जराट्पारतात्मजा ॥५॥

कौशल देशांतील अयोध्यानगरींत इक्ष्वाकु वंशाचा सहस्रबाहु राजा राज्य करीत होता त्याच्या राणीचें नांव चित्रमति ही कुब्ज देशाच्या पारत नामक राजाची मुलगी होती

तत्पुत्रः कृतवीरस्य तापसस्तत्पितृव्यस्य ।
जमदग्निस्त्वग्राहिरेणुकामपरामरी ॥ ६ ॥

त्यांना कृतवीर नामक पुत्र झाला राजा सहस्रबाहूचे काका शतबिंदु यांना पारत राजाची बहिण श्रीमती दिली होती

१ पराजितस्तपःश्रीमिः २ भूपालो ३ पारतनृपस्य पुत्री चित्रमति ४ सहस्रबाहुसुतस्य ५ सहस्रबाहोः पितृव्या शतबिन्दुनाम्ने भार्या श्रीमती या पारतस्य भगिनी तस्या श्रीमत्याः पुत्रो जमदग्निः

त्यान्ना जमदग्नि नांवाचा पुत्र झाला बाल्यपणींच त्याची आई मेल्या-
वर त्यानें दीक्षा घेतली व तपश्चरण केलें. रुक्मांगद राजा व हरि
शर्मा या नांवाचा ब्राह्मण हे दोघे मित्र होते

अपुत्रस्य गतिर्नास्तीत्यपेक्ष्या कौशिकाकृती ।
परिणापितवन्तौ तं रेणुकीं पारवास्तगजाम् ॥७॥

रुक्मांगदानें मिन दीक्षा घेतली हरिशर्मा तपस्वी होऊन मेल्या
नंतर ज्योतिषी देव झाला तपस्याचें तप अधुरं असतें व कैम
मुनींचेंच तप थार ही गोष्ट ज्योतिषदेवाला दाखवून देण्यासाठी
साधर्म्यानें लोचनाची चिमणीचें रूप देऊन जमदग्नीच्या दाढी-
मिशांत जाऊन वास्तव्य केलें निपुत्रिकाला शुभगति नाहीं
असें स्या चिमण्या आपसांत बोलू लागल्या तें ऐकून जमदग्नि
तपश्चर्या सोडून कन्याकुब्ज देशाच्या राजाकडे गेला तो
राजा त्याचा मामा होता त्याला आपली लग्न करण्याची
इच्छा जमदग्नीनें सांगितली पण कान्यकुब्ज देशाच्या राजानें
त्याचा ति रस्कार केला तरी पण आपली मुलगी रेणुका त्याला दिली
हा प्रकार पाहून चिमणीरूपी ज्योतिषदेवाची खात्री झाली की तप-
स्याचें तप अधुरं असतें

सा कामधेनुपरशू ग्याप्रसर्गिमपान्मुनः ।
स्वीकृताशुमवा मम ज्ञात्वा पार्वे समाश्रमम् ॥ ८ ।

१ ही जमदग्नि परिणापितवन्तौ २ पुत्रेषु ३ कामधारात्मा पाठेति-
द्यपिनिपुणांभृत्वी ४ चिरमतिसमिमी । ५ है पिरे केले ६ आयता ।

रेणुकेचा भाऊ वरिवयमुनि एकदां तिला भेटायास आला असतां तिनें त्याच्यापासून सम्यग्दर्शनासह अणुव्रतें प्राप्त करून घेतलीं जातांना त्यानें कामधेनु व परशु भेट देऊन तो स्वस्थानीं परत गेला

राजा सनाभिस्सद्भवो भाजितो जमदग्निना ।
स हृत्वा कामधेनुं तां सात्त्वापात फलादिकर्म् ॥९॥

एकदा सहस्रबाहुराजा आपले भाऊबंद व इतर मामक मुलासह जमदग्नीच्या आश्रमास आला असता राजाचा दुर्मि-ळ असें त्याचें आदरातिथ्य करण्यांत आलें कामधेनूमुळे तो तें करूं शकला राजानें ती कामधेनू मागितली जमदग्नि देईना म्हणून त्याला ठार मारून ती घेऊन गेला

आहूत्यापनिन्द्रराम सानुमस्त्वन्मुर्न दृष्पा ।
हत्वा त्रिःसप्तकृत्वान्यान्क्षत्रियानाशुनगम्भवम् ॥१०॥

जमदग्नीला इंद्रराम व श्वेतराम असे दोन पुत्र होते ते फळें गोळा करण्यास गेले होते परत आल्यावर ते दृश्य पाहून ते रामा-परशु हे नेऊन अयोध्येंत जाऊन सहस्रबाहु व कृतवीर्यानीं त्यांचे आणि सहस्रबाहुस ठार मारून कामधेनु परत घेऊन आले नंतर त्यांनीं रागानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली व स्वतः पृथ्वीचें राज्य भोगलें

१ सहस्रबाहुः २ सेना ३ आह्वान परीक्षा ४ जमदग्निपुत्र ५ शस्त्र-मात्र ।

दिव्यैःफलैर्भवेस्यापि पोतेनामारयत्स्वय ।
प्रागजन्माकृतिमादर्श्य पैरं प्रोक्त्वासिपं मुने ॥२१॥

ज्योतिषदेव वेस्यरूपानें कांही दिवस दिव्य फळ पुढें सुमीमाला आणून देऊं लागला राजाला त्याची घटक लागली पण आतां ती मिळणें शक्य नाहीं तरी तुम्ही मजबरोबर चलांत चला म्हणून आणिक मिळतील राजा फळांच्या आशेनें त्याचेबर विश्वास ठेवून निघाला समुद्रांतून जात असतां आपलें पूर्वीचें आपल्याचें रूप देवानें दाखवून सुमीमाला ठार मारलें

सुतो रामो भामन्मी रौद्रध्यानाद्‌धोऽगमत् ।
सहस्रबाहुस्तत्पुत्रो लोभात्तिर्यग्गतिं गतौ ॥ २२ ॥

याप्रमाणें जमदग्नि मुनीचे मुलगे इंद्रराम व परशुराम रौद्रध्यानानें नरकांत पडले व सहस्रबाहु आपल्या पुत्रासह लोभकषायामुळें तिर्यंच गतीस जन्मले

रामपुत्रस्तपोऽर्भेकमकाराश्रयेश्चस्यवान् ।
सुकृती प्राप्य सौधर्मं च्युतो चक्रपुरेशिनः ॥ २३ ॥

सुकेतु राजाच्या आश्रयानें पुंडरीकाचा घोर निदानपूर्वक तप आचरून सौधर्म नामक पहिल्या स्वर्गांत देव झाला व तेथून तो भरतक्षेत्रांत चक्रपुरच्या इक्ष्वाकुवंशाचा राजा वरसेन व राणी लक्ष्मीमती यांच्या पोटीं पुंडरीक नावानें जन्मला

१ परस्परयोर्भिस्तिरस्तर्येषु २ जमदग्नेः पुत्रः ३ इंद्रवीरः ४ अंचुकी-पमले ५ निपे प्रस्तपान् ६ मित्रवमनुदर्शनपरौ ।

इत्वाकोर्मैरसेनस्य तावपूर्वी सुतावित ।
नंदिषेणो बलः पूर्वं पुंडरीको हरिः परः ॥ २४ ॥

त्याच राजाच्या वैजयंती राणीपासून नंदिषेण बलदेव जन्मला व पुंडरीक वासुदेव होता

पद्मावतीमिन्द्रपुरपीश्वरोपेंद्रसेनजाम् ।
तेमूढवन्तमाकर्ण्य सुकेतुवरपद्मस्मृत् ॥ २५ ॥

इंद्रपुरचा राजा उपेंद्रसेन याने आपली मुलगी पद्मावती पुंडरीकाला दिली या प्रमाणे वृत्त ऐकून सुकेतूचा वंशज जो निशुंभ नामें करून चक्रपुरचा राजा झाला होता, परंतु सत्पत्ना

निशुम्भास्य क्रुधा युध्यन्हत्वस्तेनाप सान्निधन् ।
हरिस्तमर्भमर्मा रामश्चिपयोपापिच्छिर्न गत ॥ २६ ॥

तो पुंडरीकाशी युद्ध्यास येऊन व त्याच्याकडून मारला जाऊन तम.प्रभा नरकास गेला पुष्कळ वर्षे राज्यवैभव भोगून पुंडरीकही त्याच नरकास गेला त्याच्या वियोगामुळे नंदिषेणाला वैराग्य प्राप्त झाले तो दीक्षा घेऊन तपश्चरण केल्यावर मोक्षाला गेला

**इति श्रीअरमापसुमौमपाक्षिनान्दिषेणबलपुंडरीकविष्णुतच्छत्रुनिशुम्भवृत्तोत्तरमहापशाम् ॥ १८ ॥**

---

मास्मेरा कण्ठकायस्ता पीतमाल्यपुरअपिराद् ।
पार्श्वे वैश्रवणो भौ स मृगस्तनरोगिरा ॥ १ ॥

पुंडरीक २ परिणीतवान ३ कांचनी पद्मपुरीकथम ४ युद्ध्यमान् ५ पुंडरीकेण ६ अन् ७ स नरकं गतः ८ मल्लीतीर्थंकरस्य ।

जंबूद्वीपांत मेरुपर्वताच्या पूर्वेस कच्छकावती देशांतील वीतशोकपुरांत वैश्रवणनामक राजा राज्य करीत होता सुगुप्ताचार्यांकडून त्यानें अणुव्रतें घेतलीं होतीं

उपात्ताणुव्रतोऽभ्यस्तरत्नत्रयविधानकः ।
जातु वर्षागमे प्राप्ते वनश्रेणी प्रपश्यकम् ॥ २ ॥

तो रत्नत्रयव्रतधारी होता एकदां पावसाळ्याचे प्रारंभीं वनशोभा पाहण्यास तो गेला असतां त्यानें एक वटवृक्ष पाहिला

पृथुदरोभव दृष्ट्वा नानापक्षिकुलाकुलम् ।
प्रत्यस्याग्रवनं गत्वा रन्त्वागच्छन्निरीक्ष्य तम् ॥ ३ ॥

त्यावटवृक्षाच्या फांद्या विस्तीर्ण पसरल्या होत्या व बुंधा फार मोठा होता त्यावर अनेक जातीच्या पक्ष्यांचें थवे होते वनशोभा पहात तसाच तो पुढें गेला परततांना त्यानें तो वटवृक्ष पुन्हा पाहिला

विद्युता भस्मितं भासवैराग्योऽनुचरस्तपः ।
श्रीनागपतिसान्निध्ये तीर्थकृत्त्वमुपार्ज्य च ॥ ४ ॥

त्यानंतर वीज पडून तो छिन्नविच्छिन्न झाला त्यामुळें त्याला वैराग्य झालें त्यानें श्रीनागमुनींजवळ दीक्षा घेऊन तपश्चरण केलें व तीर्थंकर नामकर्म बांधलें

६ उपात्त सुगुप्ताचार्याच्या पासीं अणुव्रत येन । ७ समूह व्याप्त ।

